महाराष्ट्र विधानसभेच्या सभागृहात देण्यात आलेल्या आश्वासनांच्या पूर्ततेची परिपूर्ण माहिती विधानसभा आश्वासन समितीस देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**संसदीय कार्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : विसआ-२०१५/प्र.क्र.३०/सहा**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- ६ नोव्हेंबर, २०१५**

वाचा :- १) शासन निर्णय, संसदीय कार्य विभाग, क्रमांक - एलईजी - १०९८/ प्र.क्र.५१/९८/पाच, दिनांक २ डिसेंबर, १९९८.
२) शासन शुद्धिपत्रक, संसदीय कार्य विभाग, क्रमांक - एलईजी - १०९८/ प्र.क्र.५१/९८/पाच, दिनांक १ जानेवारी, २०००.
३) शासन परिपत्रक, संसदीय कार्य विभाग, क्रमांक - विउसू - २००६/प्र.क्र.५२७/चार, दिनांक ५ एप्रिल, २००६.
४) शासन परिपत्रक, संसदीय कार्य विभाग, क्रमांक - विसआ - २००८/प्र.क्र.९/सहा, दिनांक १४ ऑक्टोबर, २००८.
५) शासन पत्र, संसदीय कार्य विभाग, क्रमांक - विपआ - २०१२/प्र.क्र.४/चार, दिनांक ३० जानेवारी, २०१३.
६) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक - शाकाप २०१३/प्र.क्र.२/१८ (र.व.का.), दिनांक २६ फेब्रुवारी, २०१३.
७) शासन परिपत्रक, संसदीय कार्य विभाग, क्रमांक - विपआ - २०१५/प्र.क्र.६१/चार, दिनांक १८ सप्टेंबर, २०१५.
८) शासन शुद्धिपत्रक, संसदीय कार्य विभाग, क्रमांक - विपआ - २०१५/प्र.क्र.६१/चार, दिनांक २३ सप्टेंबर, २०१५.
९) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन मुंबई यांचे अर्धशासकीय पत्र क्र. ४१०५१/विसआस/ड-१४, दिनांक १९ ऑक्टोबर, २०१५.

**-: शासन परिपत्रक :-**

महाराष्ट्र विधानसभा आश्वासन समिती ही महाराष्ट्र विधानसभा नियम २२६ अन्वये गठीत करण्यात आलेली एक महत्त्वाची समिती असून, शासनाच्यावतीने सभागृहात दिलेली आश्वासने, वचने व हमी यांची पूर्तता विहीत मुदतीत व परिपूर्णपणे झाली आहे किंवा नाही, याबाबतची तपासणी करण्यासाठी प्रस्तुत समितीची स्थापना करण्यात आली आहे.

२. विधानमंडळाच्या सभागृहात शासनाच्यावतीने मा. मंत्री, तसेच, मा. राज्यमंत्री महोदयांनी दिलेली आश्वासने, वचने व हमी यांची पूर्तता ९० दिवसांच्या विहीत मुदतीत व परिपूर्णपणे करणे, ही शासनाची वैधानिक जबाबदारी आहे. मंत्रालयीन विभागांकडून पूर्तता झालेल्या आश्वासनांच्या विवरणपत्रांचे वाचन करताना आश्वासन समितीच्या असे निदर्शनास आले आहे की, आश्वासन पूर्ततेच्या विवरणपत्रामध्ये देण्यात येणाऱ्या माहितीमध्ये, नेमके कोणते आश्वासन शासनाच्यावतीने देण्यात आले आहे, त्यावर विभागाने काय कार्यवाही केली आहे याबाबत मूळ विषयाच्या अनुषंगाने सुसंगत, सर्व समावेशक व परिपूर्ण माहिती दिली जात नाही व त्यासंदर्भात आवश्यक तेथे, संबंधित आश्वासनांचे कार्यवृत्त सोबत जोडले जात नाही. त्यामुळे, संबंधित आश्वासनांची पूर्तता शासनाने कशाप्रकारे आणि किती कालावधीत केली आहे याबाबतची वस्तुनिष्ठ माहिती समितीस उपलब्ध होत नाही. सदरहू बाब अत्यंत गंभीर स्वरुपाची असल्यामुळे, समितीचे कामकाज सुरळीतपणे पूर्ण होण्यास विलंब होतो. ही बाब महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाने त्यांच्या पूर्वोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक ९ येथील अर्धशासकीय पत्राद्वारे माझ्या निदर्शनास आणली आहे.

३. आश्वासन पूर्ततेची कार्यवाही विहीत वेळेतच व परिपूर्णपणे करण्याबाबतच्या सूचना यापूर्वी उपरोक्त संदर्भाधीन शासन आदेशान्वये व पत्रान्वये सर्व मंत्रालयीन विभागांना वेळोवेळी देण्यात आल्या आहेत. तथापि, त्यांचे अनुपालन केले जात नसल्यामुळे, पूर्वोक्त परिच्छेदांत उल्लेखिलेली वस्तुस्थिती उद्भवली आहे. महाराष्ट्र विधानमंडळाच्या उभय सभागृहाच्या विविध समित्या यांचे महत्त्व अनन्यसाधारण असून, त्यांना त्यांचे कामकाज सुरळीतपणे पार पाडण्यासाठी, त्यांना आवश्यक असलेली माहिती परिपूर्णपणे व अद्यायावत स्वरुपात आणि विहीत मुदतीतच देणे ही सर्वच मंत्रालयीन विभागांची जबाबदारी आहे. यास्तव, सर्व मंत्रालयीन विभागांना **पुन्हा असे निदेश** देण्यात येत आहेत की, आश्वासन समितीला यापुढे सादर केल्या जाणाऱ्या आश्वासन पूर्ततेच्या विवरणपत्रातील **माहिती परिपूर्ण,अद्ययावत आणि आश्वासनाच्या पूर्ततेच्या दृष्टीने नेमकी कोणती कार्यवाही केली आहे, याबाबतची माहिती दर्शविणारी राहील व आवश्यक तेथे संबंधित आश्वासनांचे कार्यवृत्त जोडण्यात येईल, याबाबत सर्व विभागांनी यापुढे दक्षता घ्यावी,** जेणेकरुन आश्वासन समितीला आवश्यक ती माहिती विनाविलंब मिळेल व त्यांचे कामकाज सुरळीतपणे पार पाडले जाईल.

४. उक्त निदेशांचे काटेकोरपणे पालन होण्याच्या दृष्टीने सर्व विभागीय सचिवांनी व्यक्तिश: लक्ष द्यावे.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१५११०४१६५१५६२११५ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Swadheen S Kshatriya

Digitally signed by Swadheen S Kshatriya
DN: c=IN, o=All India Service, ou=Chief Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Swadheen S Kshatriya
Date: 2015.11.06 18:44:35 +05'30'

**(स्वा.शि.क्षत्रिय)**
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
(२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
(३) प्रधान सचिव/सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,(ड-१३ व ड-१४ शाखा), विधानभवन, मुंबई-४०० ०३२.
(४) उप सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
(५) सर्व मा. मंत्री/मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
(६) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
(७) निवडनस्ती

**प्रतिलिपी,**

(१) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-४०० ०३२.
(२) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-४०० ०३२.